**ग्रंथालय संचालनालय, मुंबई व संचालनालयाच्या अधिपत्याखालील कार्यालयातील अस्थायी पदे पुढे चालू ठेवणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-मराग्रं-२०१७/प्र.क्र.४५/ग्र.क..**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०६ मार्च, २०२४.

**वाचा :-**

१. शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मराग्रं-२५११/प्र.क्र.४५/२०१७/साशि-५, दि.२७/०९/२०२३.
२. शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.२१/०२/२०२४
३. ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांचे पत्र जा.क्र.१४/२०२३-२४/७९६७, दि.०१/०३/२०२४

**प्रस्तावना :-**

ग्रंथालय संचालनालय व संचालनालयाच्या अधिपत्याखालील कार्यालयांमधील एकूण १३४ अस्थायी पदे संदर्भाधीन क्र. १ येथील दि. २७/०९/२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये दि.०१/०९/२०२३ ते दि.२९/०२/२०२४ पर्यत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात आली आहे. संदर्भाधीन क्र. २ येथील शासन निर्णय वित्त विभाग दि. २१/०२/२०२४ मधील तरतूदीनुसार सर्व प्रशासकीय विभागांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच, यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.०१/०३/२०२४ ते दि. ३१/०८/२०२४ या सहा महिन्यांच्या कालावधीसाठी मुदतवाढ देण्याचे अधिकार सर्व प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत. ही बाब विचारात घेऊन, शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय-**

१. ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेकडून प्राप्त संदर्भाधीन क्र. ३ येथील दि. ०१/०३/२०२४रोजीच्या प्रस्तावास अनुसरुन ग्रंथालय संचालनालय व संचालनालयाच्या अधिपत्याखालील कार्यालयातील सोबतच्या विवरणपत्र “अ” मध्ये दर्शविलेली १३४ अस्थायी पदे दि. ०१/०३/२०२४ ते दि. ३१/०८/२०२४ पर्यत पुढे चालू ठेवण्यास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

**अ)** सदर पदे ज्या प्रयोजनासाठी निर्माण केली आहेत, त्याच प्रयोजनासाठी चालू ठेवण्यात आली आहेत.
**आ)** ग्रंथालय संचालनालयाकडे असलेल्या विद्यमान योजनांपैकी कोणतीही योजना संपलेली नाही.

२. यासंदर्भात होणारा खर्च खालील मुख्यलेखाशिर्षाखाली मंजूर असलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा:-
मागणी क्र.डब्ल्यू- ४
२२०५- कला व संस्कृती,
१०५. सार्वजनिक ग्रंथालये,
(अ) (०१)(०१) ग्रंथालय संचालनालय (२२०५ ०२५१)
(ब) (०२) (०१) शासकीय मध्यवर्ती, विभागीय व जिल्हा ग्रंथालये (२२०५ ०२७१)

**३.** सदर शासन निर्णय हा शासन निर्णय, वित्त विभाग, वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/ आ.पु.क., दि. २१/०२/२०२४अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२४०३०६१२४६४६०७०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ANITA PRAMOD TUMMULWAR

Digitally signed by ANITA PRAMOD TUMMULWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=4a2a38bd3219cb07837653760d3739e645909c87e1f590a4c48ac5be90c246e8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=39B0AF455329387CB15636BD36438437C8ADACC592042C2DF9B77B499001996D, cn=ANITA PRAMOD TUMMULWAR
Date: 2024.03.06 12:56:13 +05'30'

**( अनिता तुम्मुलवार )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**सोबत : विवरणपत्र "अ"**

**प्रति,**

१. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. प्रधान सचिव (उच्च व तंत्र शिक्षण विभाग), मंत्रालय, मुंबई-३२.
३. ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नगर भवन, मुंबई.
४. ग्रंथपाल गट-अ, राज्य मध्यवर्ती ग्रंथालय, मुंबई, शासकीय विभागीय ग्रंथालय पुणे/नागपूर. (ग्रंथालय संचालनालयामार्फत)
५. सर्व सहाय्यक ग्रंथालय संचालक/जिल्हा ग्रंथालय अधिकारी (ग्रंथालय संचालनालयामार्फत)
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. सर्व कोषागार / उपकोषागार अधिकारी
८. निवासी लेखाधिकारी, मुंबई
९. वित्त विभाग (अर्थसंकल्प १९) /(व्यय -४)/ (आ.पु.क.) /मंत्रालय, मुंबई.
१०. कार्यासन, अर्थसंकल्प शाखा, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-
११. कक्ष अधिकारी, (समन्वय शाखा) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. निवडनरती (ग्रंथालय कक्ष) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.

# विवरणपत्र "अ"

(शासन निर्णय क्रमांक-मराग्रं-२०१७/प्र.क्र.४५/ग्र.क. , दि.        मार्च, २०२४ चे सहपत्र)

| अ.क्र. | वर्ग/गट | संवर्ग/ पदनाम | मंजूर पदांची संख्या | स्थायी पदांची संख्या | अस्थायी पदांची संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | गट-अ राजपत्रित | ग्रंथालय संचालक | १ | १ | - |
| २ | | ग्रंथालय उपसंचालक / ग्रंथपाल गट-१ | ४ | ३ | १ |
| ३ | गट-ब राजपत्रित | सहाय्यक ग्रंथालय संचालक/ जिल्हा ग्रंथालय अधिकारी/ लेखाधिकारी | ५२ | ३० | २२ |
| ४ | गट-क | तांत्रिक सहाय्यक / ग्रंथालय निरीक्षक/ वितरण सहाय्यक | ७३ | ४८ | २५ |
| ५ | | अधिक्षक/ लघुलेखक | ३ | ३ | -- |
| ६ | | मुख्य लिपीक | १४ | ११ | ३ |
| ७ | | वरिष्ठ लिपीक | ३६ | २९ | ७ |
| ८ | | निर्गम सहाय्यक | १० | ०८ | २ |
| ९ | | कनिष्ठ लिपिक | ९० | ६० | ३० |
| १० | | वाहन चालक | ६ | ४ | २ |
| ११ | गट-ड | आलमारी परिचर / ग्रंथ परिचर/ पृथ:कार /नाईक/ ग्रंथवाहक / ग्रंथ बांधणीकार | ३६ | ३० | ६ |
| १२ | | शिपाई /चौकीदार / हमाल /माळी / सफाई कामगार | ९३ | ५७ | ३६ |
| | | एकूण | ४१८ | २८४ | १३४ |